**कोषागारात रोख देय अनुदान**

**अर्थसंकल्पीय अनुदान २०१०-२०११**

मागणी क्र.वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता- जागतिक बँक सहाय्यित जलविज्ञान प्रकल्प-भूजल विषय कार्यक्रम(योजनांतर्गत)
**लेखाशीर्ष २२१५१७६३- (केंद्रहिस्सा) व**
**लेखाशीर्ष २२१५ ९०७६ - (राज्यहिस्सा)**

**महाराष्ट्र शासन**

पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
शासन निर्णय क्र.बीयुडी-४४ १०/प्र.क्र.१३२ /पापु-१५,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक - २८ जून,२०१०

संदर्भ- १.पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय समक्रमांक दि.३० एप्रिल,२०१०
२.वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अंदाज-२०.१०/सीआर ७१/ अर्थसंकल्प-३ दिनांक १८ मे, २०१०

**प्रस्तावनाः-**

आर्थिक वर्ष २०१०-११ करीता विधिमंडळास सादर करण्यात आलेला अर्थसंकल्प महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१० (महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) अधिनियम २०१०यांच्या अनुसूचीच्या स्तंभ-४ मध्ये विनिर्दिष्ट करण्यात आलेल्या रकमांसह) म्हणून विधिमंडळाने मंजूर केला आहे.

सन २०१०-११ या आर्थिक वर्षात जलविज्ञान प्रकल्प टप्पा-२ वरील खर्च भागविण्यासाठी " मागणी क्र.वाय-२ २२१५- पाणी पुरवठा व स्वच्छता- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-(०६) जागतिक बँक सहाय्य प्रकल्प -(०६) (१४) जलविज्ञान प्रकल्प-भूजल विषयक कार्यक्रम (२२१५ १७६३) (केंद्र हिस्सा) ५०, इतर खर्च " या लेखाशिर्षाखाली रु.४६९.५६ लक्ष तर " मागणी क्र.वाय-२ २२१५- पाणी पुरवठा व स्वच्छता- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- जागतिक बँक सहाय्य प्रकल्प -(०६) (१५) जलविज्ञान प्रकल्प-भूजल विषयक कार्यक्रम (२२१५ ९०७६) (राज्यहिस्सा)" या लेखाशीर्षाखाली रु.१३२.४४ लक्ष या प्रमाणे एकूण रु.६०२.०० लक्षची तरतूद करण्यात आली आहे.

संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये एप्रिल २०१० व मे २०१० या कालावधीकरीता जलविज्ञान प्रकल्प-२ वरील खर्च भागविण्यासाठी "२२१५ १७६३ (केंद्र हिस्सा)" या लेखाशीर्षाखाली रु.१००.०० लक्ष लेखानुदान संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना मंजूर करण्यात आलेले आहे.

**कृ.मागे पहा...**

आता , जलविज्ञान प्रकल्प-२ वरील खर्च भागविण्यासाठी "२२१५ १७६३ (केंद्र हिस्सा)" या लेखाशीर्षाखाली रु.१३४.७८ लक्ष व "२२१५ ९०७६ (राज्य हिस्सा)" या लेखाशीर्षाखाली रु.६६.२२ लक्ष या प्रमाणे एकूण रु.२०१.०० लक्ष अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना उपलब्ध करुन देण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

सन २०१०-११ या आर्थिक वर्षात जलविज्ञान प्रकल्प टप्पा-२ वरील खर्च भागविण्यासाठी केंद्र हिश्श्यापोटी **रु.१३४.७८ लक्ष (रुपये एकशे चौतीस लक्ष अठ्ठयाहत्तर हजार फक्त) व राज्यहिश्श्यापोटी रु.६६.२२ लक्ष (रुपये सहासष्ट लक्ष बावीस हजार फक्त) याप्रमाणे एकूण रु.२०१.०० लक्ष (रुपये दोनशे एक लक्ष फक्त) एवढे अनुदान संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांना मंजूर व मुक्त करण्यात येत असून अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत आहे.**

२. जलविज्ञान प्रकल्प टप्पा-२ वरील केंद्र हिश्श्यापोटीचा खर्च " मागणी क्र.वाय-२ २२१५- पाणी पुरवठा व स्वच्छता- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-(०६) जागतिक बँक सहाय्य प्रकल्प -(०६) (१४) जलविज्ञान प्रकल्प-भूजल विषयक कार्यक्रम (२२१५ १७६३) (केंद्र हिस्सा) ५०, इतर खर्च " या प्रधान लेखाशिर्षाखाली तर राज्य हिश्श्यापोटीचा खर्च " मागणी क्र.वाय-२ २२१५- पाणी पुरवठा व स्वच्छता- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- जागतिक बँक सहाय्य प्रकल्प -(०६) (१५) जलविज्ञान प्रकल्प-भूजल विषयक कार्यक्रम (२२१५ ९०७६) (राज्यहिस्सा)" या प्रधान लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या WWW.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१००६२८१८४२२९०१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(श.वि. दुर्वे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत:

१. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, सर्व
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता)
४. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर(लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)
५. नियोजन विभाग, का-१४४३, का- १४१४
६. वित्त विभाग, अर्थसंकल्प-२०, व्यय-३ ( २ प्रती)
७. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने पापु-०४, पापु-०५ पापु-२०
८. पापु-१५निवड नस्ती